**कोषागारातून रोख देय अनुदान**
केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन
सन २०१४-१५ करिता राज्य हिश्श्याच्या
अनुदानाचे वितरण (विशेष घटक योजना)
(२२१५ १७९२)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-१२१४/प्र.क्र.७४/पापु-१६

जी.टी. रूग्णालय संकुल, ७ वा मजला,
टिळक रोड, मुंबई- ०१
तारीख: १ डिसेंबर, २०१४

वाचा

**१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.१ जुलै, २०१४.**
**२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.२८ जुलै, २०१४.**
**३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे पत्र क्रमांक : विघयो-२०१३/प्र.क्र.७१/विघयो, दि.१३ फेब्रुवारी, २०१४.**

प्रस्तावना

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१४ (महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १२ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ८, दि. १८ जून, २०१४ अन्वये प्रसिद्ध करण्यात आले असल्याचे कळविण्यात आले आहे.

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या राज्य हिश्श्यासाठी (शौचालय बांधकाम) विशेष घटक योजनेखाली २२१५ १७९२ या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ साठी रु.२३०.२८ लक्ष निधीचा नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे एकूण अर्थसंकल्पीत केलेल्या निधीच्या ६० टक्के रक्कम उपलब्ध करुन दिलेली आहे.

सदर उपलब्ध निधी संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय

**सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (पूर्वीचे निर्मल भारत अभियान) कार्यक्रमाच्या राज्य हिश्श्यासाठी ( शौचालय बांधकाम ) विशेष घटक योजनेखाली रु.२३०.२८ लक्ष अर्थसंकल्पीत केलेले आहे. सदर अर्थसंकल्पीत रकमपैकी रु.१३८.१६८ लक्ष (एक कोटी अडतीस लक्ष सोळा हजार आठशे फक्त) इतके अनुदान संबधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना**

**सोबत जोडलेल्या विवरणत्रानुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे रोख स्वरुपात मुक्त करण्यात येत आहे.**

२. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, ग्रामीण स्वच्छता - पंचायतीराज संस्थाना वित्तीय सहाय्य, ग्रामसफाई कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय्य (राज्य पुरस्कृत योजना) (०२) (०२) शौचकुपी बांधणे (विशेष घटक योजना) (२२१५ १७९२)" ३३ अर्थ सहाय्य, या लेखाशीर्षाखाली घालावा.

३. या शासन निर्णयाखालील अनुदान पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाव्दारे मंजूर केलेले अनुदान ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित जिल्हा परिषदांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) संबंधित जिल्हा परिषदेने या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) अट क्रमांक ३-अ आणि ३-आ यांची पूर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२ नागपूर यांच्याकडे तपासणीसाठी जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावेत.

ई) शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील कार्यासन क्र.पापु-०५, पापु-१६ व पापु-२० ला सादर करावे.

**उ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहीत नमुन्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक जिल्हा परिषदेने महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी.**

**ऊ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करावे.**

४. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१७६/विघयो, दि.१५.११.२०१४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेने तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.२८ जुलै, २०१४ च्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०११०५७२४७८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.12.01 16:58:47 +05'30'

**(वि. य. गोखले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२, मुंबई/नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता)
२. विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर .
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, नंदूरबार, अहमदनगर, पुणे, कोल्हापूर, नांदेड, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, यवतमाळ, चंद्रपूर व गडचिरोली.
४. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती ठाणे, नंदूरबार, अहमदनगर, पुणे, कोल्हापुर, नांदेड, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, यवतमाळ, चंद्रपूर व गडचिरोली.
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, नंदूरबार, अहमदनगर, पुणे, कोल्हापुर, नांदेड, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, यवतमाळ, चंद्रपूर व गडचिरोली.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, नंदूरबार, अहमदनगर, पुणे, कोल्हापुर, नांदेड, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, यवतमाळ, चंद्रपूर व गडचिरोली.
७. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं), जिल्हा परिषद, ठाणे, नंदूरबार, अहमदनगर, पुणे, कोल्हापुर, नांदेड, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, यवतमाळ, चंद्रपूर व गडचिरोली.
८. नियोजन विभाग, (का.क्र. १४४३) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. वित्त विभाग, (अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
११. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
१२. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, ठाणे, नंदूरबार, अहमदनगर, पुणे, कोल्हापुर, नांदेड, हिंगोली, औरंगाबाद, अमरावती, यवतमाळ, चंद्रपूर व गडचिरोली.
१३. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई - ४०० ०३२.
१४. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सीबीडी, बेलापूर, नवी मुंबई.
१५. कार्यासन क्रमांक पापु-०४, पापु-०८ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१६. निवड नस्ती, कार्यासन क्रमांक पापु-१६.

# विवरणपत्र

शासन निर्णय क्र. स्वभामि-१२१४/प्र.क्र.७४/पापु-१६, दि.१ डिसेंबर, २०१४ सोबतचे सहपत्र.

| अ. क्र. | जिल्हा परिषद | सन २०१४-१५ अर्थसंकल्पीय तरतुद राज्य हिस्सा (रु.लक्ष) | दि. १ डिसेंबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेली रक्कम (रु.लक्ष) | दि.१ डिसेबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेली रक्कम (अक्षरी) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | ठाणे | २०.०० | १२.०० | बारा लाख फक्त |
| २. | नंदूरबार | ५.०९ | ३.०५४ | तीन लाख, पाच हजार, चारशे फक्त |
| ३. | अहमदनगर | ५.०० | ३.०० | तीन लाख फक्त |
| ४. | पुणे | ४.२९ | २.५७४ | दोन लाख, सत्तावन्न हजार, चारशे फक्त |
| ५. | कोल्हापूर | १.०० | ०.६० | साठ हजार फक्त |
| ६. | अमरावती | ५०.०० | ३०.०० | तीस लाख फक्त |
| ७. | यवतमाळ | ५०.०० | ३०.०० | तीस लाख फक्त |
| ८. | औरंगाबाद | ५.०० | ३.०० | तीन लाख फक्त |
| ९. | नांदेड | १५.०० | ९.०० | नऊ लाख फक्त |
| १०. | हिंगोली | ३.०० | १.८० | एक लाख, ऐंशी हजार फक्त |
| ११. | चंद्रपूर | ३६.९० | २२.१४ | बावीस लाख, चौदा हजार फक्त |
| १२. | गडचिरोली | ३५.०० | २१.०० | एकवीस लाख फक्त |
| **एकूण** | १२ | **२३०.२८** | **१३८.१६८** | **एक कोटी, अडतीस लाख, सोळा हजार, आठशे फक्त** |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.12.01 17:01:35 +05'30'

**( वि. य. गोखले )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन